लघुलेखक, गट-ब संवर्गातून स्वीय सहायक,
गट-अ या संवर्गात निव्वळ तात्पुरती पदोन्नती
देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन आदेश क्रमांक : एमएफएस-२०२१/प्र.क्र.३४/फ-८**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०८ फेब्रुवारी, २०२२.

**शासन आदेश :-**

सन २०२०-२१ च्या निवडसूचीमधून वन विभागातील "लघुलेखक (उच्चश्रेणी) (गट-ब) (अराजपत्रित) या संवर्गातून स्वीय सहायक (गट-अ) (राजपत्रित) या संवर्गात खालील अधिकाऱ्यांना सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नतीने पदस्थापना देण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नांव | सद्याची पदस्थापना | पदोन्नतीनंतर पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|
| १ | श्री.दत्तात्रय बाबा गुजले, लघुलेखक (उच्चश्रेणी)(गट-ब) | मुख्य वनसंरक्षक (शिक्षण व प्रशिक्षण ) पुणे | स्विय सहायक गट-अ (राजपत्रित) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) पश्चिम मुंबई |
| २ | श्री. मिलिंद रमेश बारी, लघुलेखक (उच्चश्रेणी)(गट-ब) | अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक व केंद्रस्थ अधिकारी, महाराष्ट्र राज्य, नागपूर | स्विय सहायक गट-अ (राजपत्रित) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संधारण) महाराष्ट्र राज्य, नागपूर |
| ३ | श्री. यशवंत मनोहर नाईक, लघुलेखक (उच्चश्रेणी)(गट-ब) | वनसंरक्षक (मुल्यांकन) नागपूर. | स्विय सहायक गट-अ (राजपत्रित) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर. |

२. सामान्य प्रशासन विभागाने स्विय सहायक गट-अ (राजपत्रित) संवर्गातील पदोन्नती कोटयातील रिक्त पदे निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात सेवा जेष्ठतेनुसार मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ च्या अधिन राहून दि.२५.०५.२००४ स्थितीनुसार सेवाज्येष्ठतेने, दि.०७.०५.२०२१ रोजीच्या शासन निर्णयामधील तरतूदीनुसार भरण्यास मान्यता दिली आहे. सदर शासन निर्णयाविरुध्द मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे आव्हान देण्यात आले असून त्यामधील अंतिम निर्णयाच्या अधीन राहून पदोन्नती देण्यात येत आहे.

३. दिव्यांग कर्मचाऱ्यांना गट-अ व गट-ब मधील पदांवर पदोन्नतीबाबत मा. उच्च न्यायालय, मुंबई यांच्या दि.२२/७/२०२१ रोजीच्या निर्णयानुसार दिव्यांग आरक्षणासह पदोन्नतीची सर्व रिक्त पदे सामान्य प्रशासन विभागाच्या दि.०५/०७/२०२१ रोजीचा शासन निर्णय व दि.२३/७/२०२१ रोजीच्या शासन पत्रामधिल सुचनाच्या अधिन राहून पदोन्नती देण्यात येत आहे.

४. सदर पदोन्नती निव्वळ तात्पुरत्या स्वरुपाची असल्याने या तात्पुरत्या पदोन्नतीच्या परिणामी निवडसूचीतील अधिकाऱ्यांना नियमितपणाचा कोणताही हक्क मिळणार नाही.

५.	निवडसूचीतील ज्या अधिकाऱ्यांच्याविरुद्ध विभागीय चौकशी सुरु असेल त्यांच्याबाबत सामान्य प्रशासन विभागाच्या दि.१५/१२/२०१७ व दि.३०.०८.२०१८ रोजीच्या शासन निर्णयामधील तरतुदीनुसार कार्यवाही केलेली आहे.

६.	निवडसूचीतील अधिकाऱ्यांनी सामान्य प्रशासन विभागाच्या दि. १ ऑगस्ट, २०१९ च्या शासन निर्णयात विहित केलेल्या पदोन्नतीसाठीच्या निकषाची पूर्तता केली आहे. या अटीच्या अधिन पदोन्नती देण्यात येत आहे.

७.	पदोन्नत झालेल्या अधिकाऱ्याने स्विय सहायक गट-अ, या पदाचा कार्यभार ग्रहण केल्यानंतर वेतन निश्चितीचा विकल्प द्यावा. असा विकल्प दिल्यास, त्यांची वेतन निश्चिती महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियमावली १९८१ मधील नियम क्र. ११(१) (ए) नुसार पदोन्नतीचा दिनांक विचारात घेऊन करण्यात यावी.

८.	सदर पदोन्नत अधिकाऱ्यांना पदोन्नतीनंतर संबंधित नियंत्रण अधिकाऱ्यांनी तात्काळ कार्यमुक्त करावे. पदोन्नत अधिकाऱ्यांनी पदोन्नतीनंतर तात्काळ पदस्थापनेच्या पदावर हजर व्हावे. कार्यमुक्तीनंतर विहित मुदतीत ते पदस्थापनेच्या पदावर हजर झाले नाहीत, तर त्यांना सदर पदोन्नतीमध्ये स्वारस्य नाही असे गृहीत धरुन शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, दि.३०/४/१९९१ व दि.१२/९/२०१६ मधील तरतुदीनुसार त्यांची पदोन्नती रद्द करण्यात येईल. तसेच पदोन्नती नाकारणाऱ्या अधिकाऱ्यास आश्वासित प्रगती योजनेअंतर्गत स्वीय सहायक (गट-अ) पदाचा १२/२४ वर्षाचा लाभ दिला असल्यास तो तात्काळ थांबविण्यात यावा.

९.	तसेच संबंधित अधिकारी यांना पदोन्नतीच्या पदावर हजर होण्यासाठी कोणत्या दिनांकास कार्यमुक्त केले आणि ते पदोन्नतीच्या पदावर कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत संबंधित नियंत्रक अधिकारी यांनी आपला अहवाल शासनास ananda.shendge@nic.in या ई-मेल संकेतस्थळावर त्वरीत सादर करावा.

१०.	सदर शासन आदेश, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०२०८१५५३५८४७१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANANDA SHANKAR SHENDAGE

Digitally signed by ANANDA SHANKAR SHENDAGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0db7067f83b51744741b4485650edc8705560188be635df819605b4913ead056, pseudonym=F47821202A3D8C06F80E6240CB6E122AFEEDD6F5, serialNumber=DCED31BA3BA0E455430F67304905C6E3544DAE39602268D4CF2844818A1F80A4, cn=ANANDA SHANKAR SHENDAGE
Date: 2022.02.08 15:56:50 +05'30'

**(आनंदा शेंडगे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य,नागपूर.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य,नागपूर.
४. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
५. प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण, म.रा., पुणे.

६. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्मिक), नागपूर.
७. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (प्रशासन - दुय्यम संवर्ग), म.रा., नागपूर.
८. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) पश्चिम मुंबई.
९. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संधारण) म.रा. नागपूर .
१०.महालेखापाल (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/ नागपूर
११.उप सचिव (कार्यासन-१२), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
१२.जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर/मुंबई
१३.संबंधित अधिकारी / प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), म.रा.नागपूर यांचे मार्फत
१४.निवड नस्ती (फ-८ कार्यासन) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.